<u>अटल सौर कृषि पंप योजना-२</u>

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र.सौरप्र-२०१८/प्र.क्र.२३/ऊर्जा-७**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ०७.०२.२०१९

**<u>वाचा</u> :-** १) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्रमांक सौरप्र-२०१८/प्र.क्र.२३/ऊर्जा-७, दिनांक ०३.११.२०१८.
२) महाव्यवस्थापक, (सौर) महाऊर्जा यांचे पत्र क्र. आरईएन/सौर कृषि पंप/२०१८-१९/५२१७, दिनांक २७.१२.२०१८

**<u>प्रस्तावना :</u>**

केंद्र शासनाने राष्ट्रीय स्तरावर एक लाख नग सौर कृषी पंपाच्या योजनेसाठी रुपये ४००.०० कोटी एवढी तरतूद घोषित केली होती. या अंतर्गत राज्यासाठी केंद्र शासनाने दिनांक ९ डिसेंबर, २०१४ रोजी ६१४० नग, दिनांक ३० डिसेंबर, २०१४ रोजी १४०० नग व दिनांक २९ जानेवारी, २०१६ रोजी २४६० नग असे एकूण १०,००० नग सौर कृषी पंप आस्थापित करण्यासाठी मंजुरी दिलेली होती. त्यास अनुसरून एकूण १०,००० नग सौर कृषी पंपाचे उद्दिष्ट निश्चित करून त्यानुसार "अटल सौर कृषी पंप योजना" च्या प्रस्तावास मंत्रिमंडळाची मान्यता घेऊन शासन निर्णय क्रमांक सौरप्र-२०१४/प्र.क्र.२१९/उर्जा-७, दिनांक २७ मार्च, २०१५ व १४ जून, २०१७ अन्वये राज्याचे सौर कृषी पंप आस्थापित करण्याचे एकत्रित धोरण जाहीर करण्यात आले.

२. सदर योजनेच्या अंमलबजावणीची जबाबदारी महाऊर्जावर टाकण्यात आली असून योजना यशस्वीरीत्या राबविण्याच्या दृष्टीने व सौर पंप घेण्यासाठी अर्जदारांना प्रोत्साहित करण्याच्या दृष्टीने त्यात बदल करण्याची विनंती विभागास वरील संदर्भ क्र. २ येथील पत्राद्वारे प्राप्त झाली आहे. त्यानुषंगाने शासन निर्णयात बदल करण्याची बाब विचाराधीन होती. त्यानुसार संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयात पुढील प्रमाणे बदल करण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

१. योजनेच्या संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयातील मुद्दा क्र. ४ लाभार्थी निवडीचे निकष (२) मधील तरतुदीमध्ये अतिदुर्गम भागातील शेतकऱ्यांचा प्राधान्याने विचार करावा. तसेच बोरवेल, विहीर, नदी, इत्यादी ठिकाणी शाश्वत पाण्याचा स्त्रोत उपलब्ध आहे याची खात्री महाउर्जाद्वारे करुन अशा अर्जदारांचाही विचार करावा, या बाबीचा समावेश करण्यात यावा.

२. योजनेच्या संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयातील मुद्दा क्र. ४ लाभार्थी निवडीचे निकष (१) मधील तरतुदीमध्ये योजनेची अंमलबजावणी करताना लाभार्थ्यांकडे शाश्वत पाण्याचा स्त्रोत उपलब्ध करण्याची जबाबदारी महाउर्जाद्वारा निश्चित केलेल्या सक्षम प्राधिकाऱ्याकडून खात्री करून घेण्यात

यावी. योजनेच्या अंमलबजावणी करिता निर्माण करण्यात आलेल्या जिल्हास्तरीय समिती बाबत असा निर्णय घेण्यात आलेला आहे की, सदर योजनेत लाभार्थी निवडीची प्रक्रिया कमी अवधीत पूर्ण होण्याच्या दृष्टीने जिल्हास्तरीय समिती रद्द करून लाभार्थ्यांची निवड करण्याकरिता महाउर्जाद्वारा योग्य कार्यपद्धती अवलंबून लाभार्थी निवडीचे निकषानुसार लाभार्थ्यां ची निवड करण्यात येईल, या बाबीचा समावेश करण्यात यावा.

३. योजनेच्या संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयातील मुद्दा क्र. ६(७) मधील तरतुदीनुसार सौर कृषी पंपासाठी पुरवठादाराकडून पाच वर्षांसाठीचा सर्वांकष देखभाल व दुरुस्ती करार नोंदणीकृत करण्याची करण्यात आलेली सक्ती रद्द करण्यात यावी व हमी कालावधीत पुरवठादाराची सुरक्षा अनामत /बँक गॅरेंटी महाऊर्जाकडे असल्याने, प्रत्येक सेवा पुरवली नाही तर त्या सेवेची रक्कम अशा सुरक्षा अनामत/ बँक गॅरंटी रकमेतून वसूल करण्यात यावी. तसेच प्रत्येक जिल्ह्यात दुरुस्ती केंद्र उभारणे व तक्रार नोंदणीसाठी टोल फ्री क्रमांक उपलब्ध करून देण्याची जबाबदारी पुरवठादारावर टाकण्यात यावी.

४. सदर योजनेच्या संदर्भ क्रमांक (१) येथील शासन निर्णयातील मुद्दा क्रमांक ६ मधील (अट क्रमांक १६(४)) येथील जलस्त्रोताचे विभागवार भूजल उपलब्धता नकाशे उपलब्ध करण्याची आवश्यकता नाही, याबाबतची संपूर्ण जबाबदारी महाऊर्जाची राहील.

५. सदर योजनेतील सौर कृषी पंपाद्वारे झालेला वीजवापर हा अपारंपरिक ऊर्जा खरेदी बंधन (RPO) करिता पात्र धरण्यात यावा, या बाबीचा नव्याने समावेश करण्यात यावा.

६. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०२०७१५३७०३१७१० असा आहे. हा आदेश डीजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशावरुन व नावाने,

Digitally signed by Nanasaheb Rajaram Dhane
Date: 2019.02.08 14:44:23 +05'30'

**( नानासाहेब ढाणे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) सर्व मंत्री / सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मुंबई,
४) विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधान भवन मुंबई,

५) सर्व विधानमंडळ सदस्य,विधान भवन, मुंबई,
६) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
७) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
९) प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांचे स्वीय सहायक,सर्व मंत्रालयीन विभाग,
११) सर्व विभागीय आयुक्त,
१२) सर्व जिल्हाधिकारी,
१३) मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा,
१४) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
१५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१६) सचिव, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, मुंबई (पत्राने),
१७) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, सूत्रधार कंपनी मर्या.,मुंबई,
१८) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या.,मुंबई,
१९) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्या.,मुंबई,
२०) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या.,मुंबई,
२१) महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा),पुणे,
२२) उप सचिव/ ऊर्जा-३, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
२३) ऊर्जा उप विभागातील सर्व कार्यासने,उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४) मुख्य विद्युत निरिक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
२५) निवड नस्ती,ऊर्जा-७, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.